गट - अ मधील संवर्गांसाठी निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्याबाबतची कार्यपध्दती आणि पात्रतेच्या अटी .....

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः निपानि -२०२३ /प्र.क्र.१३ /कार्या १२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २८ मार्च, २०२३

संदर्भ:-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वेपुर ११२१/प्र.क्र.४/सेवा-९, दिनांक १३ फेब्रुवारी २०२३.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन १२, दि. १ ऑगस्ट, २०१९.

प्रस्तावना :-

संदर्भाधीन क्र. १ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयाद्वारे राज्य वेतन सुधारणा समिती २०१७ च्या स्विकृत शिफारशी प्राप्त झाल्या आहेत. सदर शासन निर्णयासोबतच्या जोडपत्र - २ मधील अ.क्र. १ येथे "गट - अ मधील संवर्गांसाठी निवडश्रेणी लागू करणे" याबाबतची समितीची शिफारस खालीलप्रमाणे आहे .

१) सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या लाभासाठीच्या वेतनस्तर एस-२० च्या मर्यादेमुळे, गट - अ मधील वेतनस्तर एस-२० व त्यापुढील संवर्गांच्या पदोन्नतीमधील कुंठीतता दूर करण्यासाठी या संवर्गांना निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करावा.
२) **निवडश्रेणी वेतनस्तर -** खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्यात यावा.

| अ.क्र. | ७ व्या वेतन आयोगातील सुधारित वेतनस्तर | | निवडश्रेणी वेतनस्तर | |
|---|---|---|---|---|
| १ | एस -२० | रु. ५६१००-१७७५०० | एस - २३ | रु. ६७७००-२०८७०० |
| | एस - २१ | रु. ५७१००-१८०८०० | | |
| | एस - २२ | रु. ६००००-१९०८०० | | |
| २ | एस - २३ | रु. ६७७००-२०८७०० | एस - २५ | रु. ७८८००-२०९२०० |
| | एस - २४ | रु. ७११००-२११९०० | | |
| ३ | एस - २५ | रु. ७८८००-२०९२०० | एस - २७ | रु. ११८५००-२१४१०० |
| | एस - २६ | रु. ८२२००-२११५०० | | |

**परंतु, वरील तक्त्यात नमूद केलेले निवडश्रेणी वेतनस्तर आणि पदोन्नतीच्या पदाचा वेतनस्तर यापैकी जो वेतनस्तर कमी असेल तो वेतनस्तर निवडश्रेणी वेतनस्तर म्हणून मंजूर करण्यात यावा.**

३) **निवडश्रेणी वेतनस्तर लागू करण्याचे प्रमाण** -

I. निवडश्रेणी वेतनस्तर हा संबंधित संवर्गातील मंजूर पदसंख्येच्या २५ टक्के पदांना अनुज्ञेय राहील. त्यामुळे यापूर्वी ज्या संवर्गांना २५ टक्के पेक्षा कमी प्रमाणात निवडश्रेणी मंजूर करण्यात आली आहे, त्या संवर्गांनादेखील मंजूर पदांच्या २५ टक्के नुसार निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्यात यावा, तथापि, यापूर्वी ज्या संवर्गांना २५ टक्क्यांपेक्षा अधिक प्रमाणात निवडश्रेणी वेतनस्तर अनुज्ञेय केले आहेत ते यापुढेही अबाधित राहील.

II. एस - २० व त्यापुढील वेतनस्तर असणाऱ्या ज्या संवर्गाची मंजूर पदसंख्या किमान ४ इतकी आहे, अशा संवर्गांनाच निवडश्रेणी वेतनस्तर लागू करावा.

४) निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्यासंबंधीची कार्यपध्दती व पात्रतेच्या अटी सामान्य प्रशासन विभागाने निश्चित कराव्यात. तसेच यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाकडून ज्या दिनांकास आदेश निर्गमित होतील, त्या दिनांकापासून निवडश्रेणी लागू होईल.

समितीच्या उपरोक्त स्वीकृत शिफारशीनुसार निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्याबाबतची कार्यपध्दती आणि पात्रतेच्या अटी निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयाद्वारे गट-अ मधील एस-२० वेतनश्रेणी व त्यावरील वेतनश्रेणी असणाऱ्या संवर्गांसाठी निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्यासाठीची कार्यपध्दती व पात्रतेच्या अटी पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत :-

१) **निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्याची कार्यपध्दती** :- निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्यासाठी संदर्भाधीन क्र. २ येथील पदोन्नतीच्या मार्गदर्शक तत्वाबाबतच्या शासन निर्णयामधील कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

२) **निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्यासाठी पात्रतेच्या अटी व शर्ती** - निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर करण्यासाठी संदर्भाधीन क्र. २ येथील पदोन्नतीच्या मार्गदर्शक तत्वाबाबतच्या शासन निर्णयामधील पदोन्नतीसाठीच्या पात्रतेच्या अटी व शर्तींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

३) **निवडश्रेणी वेतनस्तर लागू करण्याचा दिनांक** - गट-अ मधील एस-२० वेतनश्रेणी व त्यावरील वेतनश्रेणी असणाऱ्या संवर्गातील मंजूर पदाच्या २५ टक्के प्रमाणात सेवाज्येष्ठतेनुसार जे अधिकारी वरील अ.क्र. २ नुसार पात्रतेच्या अटी शर्तींची पूर्तता करतात त्यांना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून निवडश्रेणी वेतनस्तर लागू करावा.

सदर कार्यवाहीद्वारे मंजूर पदाच्या २५ टक्के अधिकाऱ्यांना निवडश्रेणी वेतनस्तर मंजूर केल्यानंतर, भविष्यात मंजूर पदांच्या २५ टक्के प्रमाणात जसजशी रिक्तता निर्माण होईल, त्या त्या वेळी २५ टक्क्यांच्या मर्यादेत जे अधिकारी वरील अ.क्र. २ नुसार पात्रतेच्या अटी शर्तींची पूर्तता करतात त्यांना प्रत्यक्ष पद रिक्ततेच्या दिनांकापासून निवडश्रेणी वेतनस्तर लागू करावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौ. सं.क्र.१२८/२०२३/सेवा-३, दि. २४.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२८१९४३०९९००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GEETA RAHUL KULKARNI

Digitally signed by GEETA RAHUL KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=87e2e317e0d978442ac6b599d6a0abcf73fe717ee52994443a8509075101cc93, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=92D474843B842720200D1A10946D5FC9348B9450F867605A47D177207C9BD384, cn=GEETA RAHUL KULKARNI
Date: 2023.03.28 19:57:47 +05'30'

**( गीता रा. कुलकर्णी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,

५. सर्व मा. संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मा.मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (आपल्या विभागाच्या अधिपत्याखालील सर्व शासकीय कार्यालयांना हा शासन निर्णय निदर्शनास आणावा.)
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
१०.निवड नस्ती.